**नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा मुंबई यांच्या कार्यालयातील वाहन चालक पदाच्या मे.क्रिष्णा मोटर्स, मुंबई या बाहययंत्रणेकडून उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या सेवेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन आदेश क्र.वाहन-३९२४/प्र.क्र.१३८/ना.पु.१५**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय (विस्तार) मुंबई-४०० ०३२.
दिनांक १० जानेवारी, २०२५.

वाचा :- १) अ.ना.पु.व ग्रा.सं.वि., शासन निर्णय क्र. वाहन २०२४/प्र.क्र.१३८/ना.पु.-१५, दि.२८.०८.२०२४.
२) नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांचे पत्र क्र. निशि/आस्था/४अ/प्र.क्र. १२/ २०२४/ जा.४८३, दि.१०.१०.२०२४.
३) नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांचे पत्र क्र. निशि/आस्था/४अ/प्र.क्र. १२/ २०२४/ जा.४८४, दि.१०.१०.२०२४.
४) अ.ना.पु.व ग्रा.सं.वि., शासन आदेश क्र. वाहन २०२४/प्र.क्र.१३८/ना.पु.-१५, दि.११.१०.२०२४.

**प्रस्तावना:-**

अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अधिनस्त कार्यालयातील पदांचा सुधारीत आकृतीबंध दि.१८.०४.२०२२ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आला आहे. सदर आकृतीबंधान्वये नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई, विभागीय जिल्हा पुरवठा कार्यालय व राज्य अन्न आयोगाच्या कार्यालयाच्या आस्थापनेवरील वाहनचालक व शिपाई ही संवर्ग मृत घोषित करुन, त्याबाबतच्या सेवा बाह्ययंत्रणेव्दारे घेण्याबाबत मान्यता दिलेली आहे.

२. या विभागाचे कामकाज अत्यंत संवेदनशील असल्यामुळे बाह्यस्त्रोताव्दारे वाहनचालक व शिपाई संवर्गात मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्यासंदर्भात क्षेत्रिय कार्यालयाकडून विनंती करण्यात येत आहे. सदर बाब विचारात घेऊन तात्पुरती व्यवस्था म्हणून वाहनचालक व शिपाई संवर्गातील पदावर बाह्यस्त्रोताव्दारे मनुष्यबळ उपलब्ध करुन घेण्यास दि. ०९.०८.२०२३ रोजीच्या शासन पत्रान्वये मान्यता दिली आहे.

३. नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई कार्यालयाच्या आस्थापनेवरील शासकीय वाहनांवर वाहनचालक संवर्गातील कर्मचाऱ्यांची आवश्यकता लागणार असल्यामुळे शासनाने दि.०९.०८.२०२३ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या परवानगीस अनुसरुन, सदर कार्यालयाकरीता कंत्राटी तत्वावर ५ वाहनचालकांच्या सेवा उपलब्ध करुन घेण्याकरीता मे. क्रिष्णा मोटर्स, जोगेश्वरी या संस्थेसोबत करण्यात आलेल्या करारनाम्यास दि.०५.०७.२०२४ रोजीच्या आदेशान्वये दि.०१.०७.२०२४ ते दि. ३०.०९.२०२४ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यात आली आहे. सदर आदेश करारनाम्यात नमूद सर्व अटी व शर्तीच्या अधीन राहून देण्यात आलेले आहे.

त्यानुसार दि.०१.०७.२०२४ ते दि. ३०.०९.२०२४ (तीन महिने) या कालावधीकरीता सेवापुरवठादार संस्थेने उपलब्ध करुन दिलेल्या वाहनचालकांचे वेतन अदा करण्यासाठी दि.११.१०.२०२४ रोजीच्या शासन आदेशान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

४. नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई कार्यालयाच्या आस्थापनेवरील शासकीय वाहनांवर वाहनचालक संवर्गातील कर्मचाऱ्यांची यापुढेही आवश्यकता लागणार असल्यामुळे शासनाने दि.०९.०८.२०२३ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या परवानगीस अनुसरुन, सदर कार्यालयाकरीता कंत्राटी तत्वावर ५ वाहनचालकांच्या सेवा उपलब्ध करुन घेण्याकरीता मे. क्रिष्णा मोटर्स, जोगेश्वरी या संस्थेसोबत करण्यात आलेल्या करारनाम्यास दि.१०.१०.२०२४ रोजीच्या आदेशान्वये दि.०१.१०.२०२४ ते दि.३१.१२.२०२४ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यात आली आहे. सदर आदेश करारनाम्यात नमूद सर्व अटी व शर्तीच्या अधीन राहून देण्यात आलेले आहे.

५. उपरोक्त कालावधीतील (दि.०१.१०.२०२४ ते दि. ३१.१२.२०२४) ०५ वाहनचालकांचे मनुष्यबळ उपलब्ध करुन दिलेल्या आदेशानुसार मे. क्रिष्णा मोटर्स, जोगेश्वरी, मुंबई या सेवा पुरवठादार संस्थेला वेतन/अतिकालीक भत्ता अदा करण्यासाठी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन आदेश :-**

१. दि.०१.१०.२०२४ ते दि.३१.१२.२०२४ (०३ महिने) या कालावधीकरीता सेवा पुरवठादार संस्थेने उपलब्ध करुन दिलेल्या ०५ वाहनचालकांचे मनुष्यबळ मे.क्रिष्णा मोटर्स, मुंबई या सेवापुरवठादार संस्थेकडून नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांच्या कार्यालयांकरिता उपलब्ध करुन देण्यात आले आहे.

२. सदर सेवापुरवठादार संस्थेने उपलब्ध करुन दिलेल्या मनुष्यबळांच्या वेतनापोटी प्रति उमेदवार, प्रति माह रु.१९,५००/- (GST सहीत) तसेच अतिकालीक भत्ता (प्रती तास) मुंबईमध्ये रु.४०/- प्रतितास + रात्री १० नंतर कामासाठी थांबावे लागल्यास जेवण भत्ता रु.१००/- तसेच मुंबई बाहेरील भत्ता रु.२५०/- (रु.४० प्रतितास नियमानुसार) इतक्या येणाऱ्या खर्चास शासन परिपत्रक वित्त विभाग दि. ०२.०२.२०१३, दि.०२.१२.२०१३ व दि.०२.०८.२०१६ अन्वये देण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार नियमित पध्दतीने पदे भरण्यावर खर्चाच्या तुलनेत बाह्ययंत्रणेद्वारे सेवा घेतांना खर्चात १०% ते २५% बचत होईल या अटीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३. सदरचा शासन आदेश हा शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७/४/२०१५ मधील, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका -१९७८ भाग पहिला, उपविभाग-चार खर्चाच्या संकीर्ण बाबीमधील अ.क्र.११ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. वरील होणारा खर्च सदर कर्मचा-यांच्या वेतनाचा खर्च मागणी क्र. एम-२ मुख्य लेखाशीर्ष " २४०८- अन्न साठवण व वखार साठवण (०२) शिधावाटप (०२)(०१) मुंबई शिधावाटप क्षेत्र दत्तमत (२४०८ ००६४) १०- कंत्राटी सेवा" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून वित्तीय वर्ष २०२४-२०२५ करिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच त्यापुढील खर्च सदर लेखाशीर्षातील त्या-त्या वर्षी मंजूर होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२५०३१३११२१४६९६०६** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

JAGDISH MANIK KHEDKAR

Digitally signed by JAGDISH MANIK KHEDKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=bb551fb9794bc66bec3b1d1e67d9d371cf84929ab9fe6c6f1f6c908554cd901d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=87C9F49EEFE8DE748DFC03D64003C379C5F217EF3F6D86E7E73F9826340410B2, cn=JAGDISH MANIK KHEDKAR
Date: 2025.03.13 11:22:28 +05'30'

**(जगदिश मा. खेडकर)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई.
२. सर्व उप नियंत्रक शिधावाटप.
३. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
४. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. निवडनस्ती(ना.पु.१५).